**केंद्रिय वित्त आयोगाच्या निधीतून केलेल्या कामाच्या ठिकाणी माहिती फलक लावण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः पंविआ-२०२१/प्रक्र-१८६ /वित्त-४
बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट,
मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख : २३ नोव्हेंबर, २०२१.

## परिपत्रक

केंद्र शासनाकडून राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या बळकटीकरणासाठी राज्याला बंधित (टाईड) आणि अबंधीत (अनटाईड) या दोन प्रकारच्या स्वरुपात अनुदान उपलब्ध करून देण्यात येते. प्रस्तुत निधी हा पंचायत राज या तीन स्तरावर म्हणजेच जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत यांना १० : १० : ८० या प्रमाणात केंद्रीय वित्त आयोगाच्या दोन्ही प्रकारच्या अनुदानाचे वाटप करण्यात येते.

१४ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार १ एप्रिल, २०१५ ते ३१ मार्च, २०२० या कालावधीत केंद्र शासनाकडून राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या बळकटीकरणासाठी महाराष्ट्र राज्यास बेसिक अनुदानाच्या स्वरूपात रु.१३८२६.९६ कोटी आणि परफॉर्मन्स अनुदानाच्या स्वरूपात रु.२९४.८४ कोटी म्हणजेच एकूण रु.१४१२१.८० कोटी इतका निधी प्राप्त झाला आहे. १४ व्या वित्त आयोगाची मुदत जरी ३१ मार्च, २०२० रोजी संपली असली तरी निधी खर्च करण्यासाठी दि.३१ मार्च, २०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

१५ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार १ एप्रिल, २०२० ते ३१ मार्च, २०२६ या कालावधीत केंद्र शासनाकडून राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या बळकटीकरणासाठी महाराष्ट्र राज्यास बंधित आणि अबंधित अनुदानाच्या स्वरूपात रु.२८५४० कोटी मिळणार आहेत. सदर निधीच्या खर्चाबाबत केंद्र शासनाने वेळोवेळी मार्गदर्शक सूचना दिलेल्या आहेत. त्या अनुषंगाने महाराष्ट्र शासनाने मार्गदर्शक सूचनांबाबत शासन निर्णय निर्गमित केले आहेत.

१४ व्या आणि १५ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या निधीतून पुर्ण झालेल्या कामाच्या ठिकाणी खालील स्वरूपात माहिती फलक लावणे अनिवार्य आहे.

महाराष्ट्र शासन

जिल्हा परिषद -----

१. कामाचे स्वरूप :--
२. निविदा दिनोक :--
३. निविदा रक्कम :---
४. ठेकेदाराचे नाव :--
५. काम सुरू झाल्याचा दिनांक :--
६. काम पुर्ण झाल्याचा दिनांक :--
७. केंद्रीय वित्त आयोगाच्या निधीचे स्वरूप :---
८. केंद्रीय वित्त आयोगाने निधी दिलेले आर्थिक वर्ष :---

उपरोक्त काम ------- केंद्रीय वित्त आयोगाच्या निधीमधून पुर्ण करण्यात आलेले आहे.

केंद्रीय वित्त आयोगाच्या निधीचे स्वरूप म्हणजे सदर निधी बेसिक / बंधित / अबंधित स्वरूपाचा आहे नमूद करणे आवश्यक आहे. तसेच कितव्या केंद्रीय वित्त आयोगाच्या निधीतून काम करण्यात आले आहे हे ही माहिती फलकात नमूद करणे आवश्यक आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२१११७१३१९२४०१२० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: cn=PRAVIN DEVICHAND JAIN, o=Rural Development Department, ou, email=pravin.jain@nic.in, c=IN
Date: 2021.11.23 18:07:26 +05'30'

**(प्रविण जैन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत.

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा / विधान परिषद
७. मा.विधानसभा व विधान परिषद सदस्य.
८. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक.
९. मा.अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहाय्यक
१०.महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखापरीक्षा), मुंबई (पाच जादा प्रतीसह)
११.महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखापरीक्षा), नागपूर (पाच जादा प्रतीसह)
१२.सर्व विभागीय आयुक्त. (महसूल)
१३.सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष.
१४.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१५.सर्व उपसचिव / अवर सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.सर्व सहमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व विभाग)
१७.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१८.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
१९. सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत)
२०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२१. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थसंकल्प-१७ / वित्त आयोग कक्ष.)
२२. ग्राम विकास विभाग ( सर्व कार्यासने )
२३. निवड नस्ती का.क्र.वित्त-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.३२